महाराष्ट्रातील कारागृहांना अन्नधान्य व इतर
खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग
शुध्दिपत्रक क्रमांक एमएजे-०१९८/२[१०१]/पोआरएस-२.
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दि. १२. फेब्रुवारी, १९९९

वाचा:-१]महाराष्ट्र शासन, गृह विभाग, शासन निर्णय क्र.डीएफपी-०६७७/९[११५]/पोआरएस-२, दिनांक ७. १०. १९७८

२]महाराष्ट्र शासन, गृह विभाग, शासन निर्णय, क्र.एमएजे-११८८/१/[१५५]/पोआरएस२, दिनांक १३. २. १९८९

३]महाराष्ट्र शासन, गृह विभाग, शासन निर्णय, क्र.एमएजे-०१९८/२[१०१] पोआरएस-२, दिनांक ११. १. १९९९

४]महाराष्ट्र शासन, गृह विभाग, शासन निर्णय क्र.एमएजे-०१९८/२[१०१] पोआरएस-२, दिनांक २७. १. १९९९

शासन शुध्दिपत्रक -

वरील विषयासंबंधी शासनाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्रमांक एमएजे-०१९८/२[१०१]/पोआरएस-२, दिनांक २७ जानेवारी, १९९९ ला जे परिशिष्ट-"अ" निर्गमित केलेले होते त्याऐवजी सोबत जोडलेले परिशिष्ट-"अ" वाचण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ह. भि. तायडे]
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,
कारागृह महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व तुरुंग अधीक्षक
प्रिन्सीपाल, बोर्स्टल स्कूल, कोल्हापूर
महालेखापाल-१[लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र मुंबई.
कार्यकारी संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई.
महालेखापाल-१[लेखा व परीक्षा] महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२[लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-२[लेखा व परीक्षा] महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई./कृषी व सहकारी विभाग[२४सी]मंत्रालय, मुंबई./वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
कृष

## परिशिष्ट - "अ"

गृह विभाग, शासन निर्णय क्र. स्मस्जे ०१२८/२[१०१]/पोआरएस-२ दिनांक ११.१.९२ संबंधित अन्नधान्य व खाद्योपयोगी वस्तूंचा पुरवठा करण्यासाठी आवश्यक असलेल्या अटी व शर्ती.

१]महिला आर्थिक विकास महामंडळ, मागणी आल्यानंतर अन्नधान्य खाद्योपयोगी वस्तू, भाजीपाला, फळे, कांदे, बटाटे इत्यादी वस्तूंचा पुरवठा महाराष्ट्रातील सर्व मध्यवर्ती तुरुंग व जिल्हा तुरुंग वर्ग-१, वर्ग-२, वर्ग-३ यांना करेल. यात बोर्स्टल स्कूल, कोल्हापूर व नाशिक यांचाही समावेश असेल.

२]महिला आर्थिक विकास महामंडळाने सदरचा पुरवठा हा होलसेल मार्केट रेट जो अस्तित्वात आहे त्या दराने करावा. हे दर मुंबई पुरते ग्रेन डिलर असोसिएशन व मुंबईच्या बाहेर त्या ठिकाणच्या स्थानिक कृषी उत्पन्न बाजार समित्यांकडून तपास करून निर्धारीत करावेत.

३]कारागृह अधीक्षकांनी अशी खात्री करून घ्यावी की महिला आर्थिक विकास महामंडळाने लागू केलेले दर हे होलसेल मार्केट दराच्या बरोबर आहेत.

४]खाद्योपयोगी वस्तू, भाजीपाला, फळे, कांदे, बटाटे पुरवताना महिला आर्थिक विकास महामंडळाने कटाक्षाने हे पहावे की, कारागृह अधीक्षकांनी ज्या दर्जाचे व स्पेसिफिकेशनच्या वस्तू मागविल्या आहेत तोच दर्जा कायम राखावा व मागितलेल्या वस्तू ह्या वेळेवर पुरविल्या जातील ह्याची दक्षता घ्यावी. कारागृह अधीक्षकांनी बोर्स्टल स्कूलच्या प्राचार्यांनी आपली मागणीपत्रे वेळेत नोंदवावीत. महिला आर्थिक विकास महामंडळ यांनी सदरचे व्यवहारात १०% [अर्नेस्ट मनी ठरविण्यापासून] अनामत रक्कम भरण्यापासून सूट देण्यात येत आहे. मात्र, त्यांनी सदरचा माल हा वेळेवर व दर्जानुसार कारागृहांपर्यंत पाठविला जाईल याबाबत हमीपत्र देण्यात यावे. जर महिला आर्थिक विकास महामंडळाने सदरचा पुरवठा वेळेवर केला नाही तर, यासंबंधी तुरुंगांना येणारा अतिरिक्त खर्च तसेच सदर वस्तू पुरवण्याच्या अभावी त्यांनी स्थानिकरित्या खरेदी करून केलेला खर्च हा महिला आर्थिक विकास महामंडळाकडून वसूल करण्यात येईल. याबाबतीत काही वाद झाल्यास शासनाचा निर्णय हा अंतिम व बंधनकारक राहील.

५]अन्नधान्याचा व इतरतद्नुषंगिक वस्तूंचा पुरवठा हा महिला आर्थिक विकास महामंडळाने तुरुंगाच्या आवारात करावा व त्यासाठी त्यांना जो वाहतूक खर्च येईल तो खर्च स्थानिक दराप्रमाणे व कारागृह महानिरिक्षक यांनी ठरविल्याप्रमाणे देण्यात यावा.

६]वरील बाबतीत काही विवाद उत्पन्न झाल्यास तसेच सदर योजनेची अंमलबजावणी करताना काही वितुष्ट आल्यास याबाबत शासनाने घेतलेला निर्णय अंतिम व बंधनकारक राहील.

१०]कारागृहाकडून महिला आर्थिक विकास महामंडळाला चित्रे प्रदान झाल्यानंतर त्यांना दराबाबत काही शंका आल्यास, त्यांनी **एक** महिन्याच्या आत कारागृह अधीक्षकांशी संपर्क साधून शंकेचे निरसन करुन घ्यावे. त्यानंतर त्यांची कुठलीही तक्रार स्वीकारली जाणार नाही.